**अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या स्वयंसहाय्यता बचत गटांना मिनी ट्रॅक्टर व त्याची उपसाधने याचा पुरवठा करणे या योजनेतंर्गत अर्थसंकल्पित करण्यात आलेला निधी खर्च करण्यास मान्यता देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन ज्ञापन क्रमांक: अनौसं-२०१८/प्र.क्र. २५०/अजाक**

मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक: ०२ नोव्हेंबर, २०१८.

**ज्ञापन :**

आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना कळविण्यात येत आहे की, अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या स्वयंसहाय्यता बचत गटांना मिनी ट्रॅक्टर व त्याची उपसाधने याचा पुरवठा करणे या योजनेंतर्गत सन २०१८-१९ साठी अर्थसंकल्पित निधी शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक ०२ एप्रिल, २०१८ अन्वये एकूण वार्षिक तरतूदीच्या ७०% मर्यादेत खर्च करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे, त्याबाबतचे विवरण खालीलप्रमाणे आहे:

**(रुपये हजारात)**

| अ.क्र. | अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या स्वयंसहाय्यता बचत गटांना मिनी ट्रॅक्टर व त्याची उपसाधने याचा पुरवठा करणे योजना | अर्थसंकल्पित निधी रुपये | ७०% मर्यादेत खर्च करण्यास मान्यता देण्यात येत असलेला निधी रुपये |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | २२२५,<br>३१-सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर)<br>२२२५ D ३३१ | ३,२०,०००<br>(अक्षरी रुपये बत्तीस कोटी फक्त) | २,२४,०००<br>(अक्षरी रुपये बावीस कोटी चाळीस लक्ष फक्त) |

२. नियंत्रण अधिकारी यांनी उपरोक्त विवरणातील रकाना ४ मधील निधी खर्च करावा. सदर निधी खर्च झाल्यावर त्याबाबतचे विवरण व उपयोगिता प्रमाणपत्र न चूकता शासनास सादर करण्यात यावे.

३. शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक ०२ एप्रिल, २०१८ मधील तपासणी सूचीमध्ये नमूद केल्यानुसार प्रत्येक अटीची पूर्तता झालेली आहे, असे प्रमाणित करण्यात येत आहे.

४. प्रस्तुत योजनेवर होणारा खर्च मागणी क्रमांक एन-३, मुख्य लेखाशीर्ष २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग यांचे कल्याण व अल्पसंख्याक यांचे कल्याण, ०१, अनुसूचित जातीचे कल्याण, राज्य योजनांतर्गत योजना, १०२, आर्थिक विकास, (०४) (०१) बचत गटांना मिनी ट्रॅक्टर घेण्यासाठी अर्थसहाय्य, ३१-सहायक अनुदान (वेतनेतर), २२२५ डी ३३१ (दत्तमत) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून सन २०१८-१९ या वर्षात अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

५. नियंत्रण अधिकारी यांनी खर्च करताना शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक ०२ एप्रिल,२०१८ मधील अटींची पूर्तता करण्याची दक्षता घ्यावी. सदर योजनेचा निधी वितरीत करताना आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी उपयोगिता प्रमाणपत्रे तपासणीच्या अधिन राहून निधी वितरीत करावा.

६.	सदर ज्ञापन शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक ०२ एप्रिल, २०१८ नुसार प्रशासकीय विभागास प्राप्त वित्तीय अधिकारांतर्गत आणि विभागाच्या अर्थसंकल्प कार्यासनाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१८१११३१६०५०३३९२२ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dinesh Ramchandra Dingle

Digitally signed by Dinesh Ramchandra Dingle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8612f2011cf8cde3b074d561cd711c17c6c3fd836467a8648a8d21dc84bc01be, cn=Dinesh Ramchandra Dingle
Date: 2018.11.13 16:08:21 +05'30'

**( दि. रा. डिंगळे )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १, महाराष्ट्र, मुंबई.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - २, महाराष्ट्र, नागपूर.
४. महालेखापाल (लेखापरिक्षा) - १, महाराष्ट्र, मुंबई.
५. महालेखापाल (लेखापरिक्षा) - २, महाराष्ट्र, नागपूर.
६. संचालक, लेखा व कोषागरे संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. सर्व प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण विभाग.
८. सर्व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण.
९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१०. कोषागार अधिकारी, पुणे.
११. वित्त विभाग (व्यय-१४ / अंर्थसकल्प-३), मंत्रालय, मुंबई - ३२.
१२. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प/विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवड नस्ती /अजाक.